**न्यायसहायक वैज्ञानिक संस्थेच्या पदव्या न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा वैज्ञानिक अधिकारी व वैज्ञानिक सहायक या पदासाठीच्या शैक्षणिक अर्हतेस समकक्ष म्हणून ग्राहय धरणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एफएसएल-०४१५/प्र.क्र.१२७/पोल-४,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

**दिनांक :- ०७ एप्रिल, २०१५.**

**वाचा:** १) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक संस्था, मुंबई यांचे पत्र क्र.IFMS/Recruitment/ २३०/२०१५, दि.१८.२.२०१५

२) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.एनजीसी २००९/(७/०९७)/मशि ३, दिनांक ३० मार्च २०११.

**प्रस्तावना:-**

संचालक न्यायसहाक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील वैज्ञानिक अधिकारी (सायबर गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-ब व वैज्ञानिक सहायक (सायबर गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-क या पदांच्या सेवाप्रवेश नियमात समाविष्ट नसलेल्या उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या न्यायसहायक वैज्ञानिक संस्थेची डिजीटल ॲन्ड सायबर फॉरेन्सिक ॲन्ड आयटी सिक्युरीटी (Digital and Cyber Forensic and IT Security) या विषयातील पदव्युत्तर पदवी, न्यायसहायक विज्ञान शाखेतील पदवी आणि डिजीटल ॲन्ड सायबर ॲन्ड रिलेटेड लॉ (Digital and Cyber Forensic and Related Law) या विषयातील पदव्युत्तर पदविका या शैक्षणिक अर्हता न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांच्या आस्थापनेवरील वैज्ञानिक अधिकारी (गट-ब) व वैज्ञानिक सहायक (गट-क) या पदासाठीच्या सेवाप्रवेश नियमांत नमूद असलेल्या शैक्षणिक अर्हतेस समकक्ष म्हणून ग्राहय धरण्याची विनंती उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शासनास करण्यात आली आहे. त्यानुषंगाने,सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संचालक, न्यायसहायक विज्ञान संस्था यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात रकाना क्र.३ मध्ये दर्शविलेल्या शैक्षणिक अर्हता या न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील वैज्ञानिक अधिकारी (सायबर गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-ब व वैज्ञानिक सहायक (सायबर गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-क या पदांच्या रकाना क्र. २ मध्ये दर्शविलेल्या सध्याच्या सेवाप्रवेश नियमातील शैक्षणिक अर्हतेस समकक्ष म्हणून ग्राह्य धरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| पदाचे नांव | सध्याच्या सेवाप्रवेश नियमात विहीत केलेली शैक्षणिक अर्हता | सध्याच्या शैक्षणिक अर्हतेस समकक्ष म्हणून प्रस्तावित शैक्षणिक अर्हता |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| वैज्ञानिक सहायक, गट-क | १. Degree in science faculty with Physics or Computer Science or Electronics or Information and Technology at least in second class<br>**or**<br>२. Degree in Engineering with Computer Science of Electronics or Information and Technology at least in second class | १. B.Sc. (Forensic Science)<br>**Or**<br>२. Post Graduate Diploma in Digital and Cyber Forensic and Related Law |
| वैज्ञानिक अधिकारी, गट-ब | १. Degree and post graduate degree in science faculty with Physics or Computer Science or Electronics or Information and Technology at least in second class<br>**or**<br>२. Engineering Degree in Computer Science or Electronics or Information and Technology at least in second class | १. M.Sc. (Digital and Cyber Forensic and IT Security) |

२. प्रस्तुत शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१/मशि-१,दि.२०.०३.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१८१५०४०८२२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sunil Jaikumar Sovitkar

Digitally signed by Sunil Jaikumar Sovitkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Jaikumar Sovitkar
Date: 2015.04.18 15:16:16 +05'30'

(सु.ज.सोवितकर)

**उप सचिव, गृहविभाग, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.(पत्राने)

३) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४) संचालक, न्यायसहायक विज्ञान संस्था,१५- मादाम कामा रोड,फोर्ट,मुंबई -३२.

५) उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती,कोल्हापूर,नांदेड.

६) महालेखापाल १/२ (लेखा वअनुज्ञेयता/ लेखापरीक्षा ),मुंबई/नागपूर.

७) अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई,

८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती, कोल्हापूर, नांदेड.

१०) निवड नस्ती (गृहविभाग)/पोल-४.